पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) साठी
बाह्य यंत्रणेकडून मासिक दराने शिपाई व
वाहनचालक पुरविण्यासाठी दिनांक-
१.११.२०१५ ते ३१.१०.२०१६ या
कालावधीसाठी दरकरार करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः . आस्था-१०१५/ प्र.क्र.-११६/पापु-०१**
जी. टी. हॉस्पिटल संकुलण, ७ वा मजला, एल.टी. मार्ग,
नविन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: **२७ ऑक्टोबर, २०१५**

वाचा

1. **शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि २०१०/८४/विसु-१, दिनांक २७.०९.२०१०**
2. **शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि २०१३/ प्र.क्र.११/१३/विसु-१, दिनांक ०२.०२.२०१३**
3. **शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि २०१३/ प्र.क्र.११२/१३/विसु-१, दिनांक ०२.१२.२०१३**

**शासन निर्णय**

पाणी पुरवठा व स्वच्छता (खुद्द) विभागाकरीता संदर्भ क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकातील तरतुदींनुसार विभागातील शिपाई व वाहनचालकांची रिक्त पदे भरण्याकरीता बाह्य यंत्रणेद्वारे मासिक दराने शिपाई व वाहनचालक घेण्यासाठी ई-निविदा मागविण्यात आल्या होत्या. त्यानुसार प्राप्त झालेल्या निविदांमधून **लोकसेवा सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था (म), औरंगाबाद** यांची लघुत्तम दराची निविदा स्विकृत करून संस्थेची निवड करण्यात आली आहे.

२. उपरोक्त संस्थेला दिनांक १.११.२०१५ ते दिनांक ३१.१०.२०१६ या कालावधीसाठी खाली नमूद केलेल्या दराने आणि अटी व शर्तीनुसार या विभागास शिपाई व वाहनचालक पुरविणे बंधनकारक राहील.

| शिपाई पदाचा दर | वाहनचालक पदाचा दर |
|---|---|
| वेतनाचा मासिक ठोक दर रू.१०,९००/- (रुपये दहा हजार नऊशे फक्त) | वेतनाचा मासिक ठोक दर रू. १३,३००/- (रुपये तेरा हजार तीनशे फक्त) |

| | |
|---|---|
| अतिकालिक भत्ता :-<br>अ) सायंकाळी ७.००-८.०० वाजेपर्यंत .. रू. २४/-<br>आ) रात्री ८.००-९.०० वाजेपर्यंत......... रू. ३०/-<br>इ) रात्री ९.०० वाजल्यानंतर............. रू. ४०/- | अतिकालिक भत्ता रू.४०/- प्रती तास. सदर भत्ता दिवसाच्या कामाचे ९ तास झाल्यावर १ तासानंतर म्हणजेच १० तास पूर्ण झाल्यानंतर लागू होईल. |
| | मुंबई /नवी मुंबई (मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण हद्दी) बाहेरील भत्ता रू. १४०/- |
| | वाहनचालकास रात्री १०.०० वा.नंतर कामासाठी थांबावे लागल्यास जेवणभत्ता रू. १५०/- |
| | वाहनचालकास रात्री १०.०० वा.नंतर कामासाठी थांबावे लागल्यास प्रवासभत्ता रू. ८०/- |

**चतुर्थश्रेणी कर्मचारी व वाहनचालकांसाठी अटी व शर्ती**

| | |
|---|---|
| १ | वरील दर दिनांक १.११.२०१५ ते दिनांक ३१.१०.२०१६ या एक वर्षाच्या कालावधीसाठी लागू राहतील |
| २ | उमेदवार भारतीय नागरीक असावा तसेच त्यास मराठी लिहिता, वाचता व बोलता येणे आवश्यक आहे. |
| ३ | उमेदवाराचे वय १८ ते ४० वर्षे या दरम्यान असावे. |
| ४ | उमेदवाराकडे आधार कार्ड/निवडणूक ओळखपत्र/पॅन कार्ड यापैकी एखादे ओळखपत्र आवश्यक. वाहनचालकांसाठी वाहन चालविण्याची अनुज्ञाप्ती (Driving Licence) आवश्यक |
| ५ | दुर्देवाने कर्मचाऱ्यास गंभीर स्वरुपाची इजा झाल्यास वैद्यकीय खर्चाचे अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनाकडे असणार नाही. त्याची जबाबदारी संबंधीत संस्थेवर राहील. |
| ६ | शासनाने निर्धारित केलेल्या वेतनदराप्रमाणे वेतन, वेळोवेळी लागू असलेले कर व अनुज्ञेय भत्त्यांची अदायगी करणे संस्थेस बंधनकारक राहिल.उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळाला देय असलेले कायदेशीर दायित्व (Statutory Liabilities) उदा. भविष्य निर्वाह निधी, ईएसआयसी, बोनस,ग्रॅच्युईटी लेबर वेलफेअर फंड, रजा रोखीकरण इ. चा समावेश वेतनात अंतर्भुत असून संबंधित प्राधिकरणाकडे कादेशीर दायित्व जमा करण्याची जबाबदारी संस्थेची राहील व त्याबाबतची कागदपत्रे पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे वेळोवेळी/मागणीनुसार जमा करणे बंधनकारक राहील. याबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे कोणतेही दायित्व राहणार नाही. |
| ७ | मागणी केलेल्या कालावधीसाठी कर्मचारी उपलब्ध होऊ शकत नसेल अशावेळी आपल्या संस्थेमार्फत पर्यायी व्यवस्था मान्य अटींसह करण्यात यावी. अन्यथा |

| | |
|---|---|
| | नियमानुसार दंडात्मक शुल्क आकारण्यात येईल. |
| ८ | प्रत्येक दिवसाच्या कामकाजाचा कालावधी ९ तास राहिल. त्यापेक्षा जास्त कालावधीसाठी काम केल्यास शासनाच्या प्रचलित दराने अतिकालिक भत्ता देय राहिल. |
| ९ | शासकीय नियमानुसार सुट्ट्या अनुज्ञेय असतील. तसेच त्यांना सुट्टीच्या दिवशी कामावर बोलविल्यास त्या दिवसाकरिता मासिक ठोक दराच्या सरासरी प्रतिदिन दराने वेतन अनुज्ञेय राहील. |
| १० | वरील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहित वेळेत कर्मचारी पुरविणे बाबत रू. १००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करुन देणे आवश्यक आहे. |
| ११ | सदरचा करार कोणतेही कारण न देता केव्हाही संपुष्टात आणणे अथवा त्यास मुदतवाढ देणे याबाबतचा अंतिम निर्णय विभाग प्रमुखांचा राहिल. |
| १२ | जसजसे नियमित शिपाई उपलब्ध होतील तसतसे कंत्राटीपद्धतीवरील शिपायांच्या सेवा संपुष्टात आणण्यात येतील. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१४५१०८९३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Bhikaji Sant

Digitally signed by Ajit Bhikaji Sant
DN: CN = Ajit Bhikaji Sant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.27 15:54:32 +05'30'

**( अ.भि. संत )**
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ ( लेखाव अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, मुंबई.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील प्रधान सचिव/उप सचिव / अवर सचिव /कक्ष अधिकारी.

६) वित्त विभाग (वि.सु.) / विनियम कार्यासन, मंत्रालय, मुंबई
७) अध्यक्ष, लोकसेवा सहकारी बेरोजगार सेवा सहकारी संस्था (म), टाकळी, ता. खुलताबाद, जिल्हा-औरंगाबाद
८) निवडनस्ती.